महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील जिल्हा शल्य चिकित्सक व विशेषज्ञ संवर्गातील बदल्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदोन्न-१११९/प्र.क्र.३०४/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत,१० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
तारीख: २९ मे, २०२०

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४)(दोन) व कलम ४(५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतन मॅट्रीक्स मधील वेतनस्तर एस-२३ : ६७७००-२०८७०० ) मधील खालील अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १. | डॉ. एम. जी. टेहरे, अस्थिव्यंगोपचार तज्ञ, सामान्य रूग्णालय, हिंगोली (तात्पुरता संवर्ग बदलून) | अतिरिक्त जिल्हा शल्य चिकित्सक (चिकित्सा), सामान्य रूग्णालय, हिंगोली. (मूळ संवर्गात) |
| २. | डॉ. सुधाकर म्हस्के, अस्थिव्यंगोपचार तज्ञ, सामान्य रूग्णालय, जालना. | अस्थिव्यंगोपचार तज्ञ, सामान्य रूग्णालय, औरंगाबाद. (रिक्तपदी) (प्रशासकीय कारणास्तव) |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांना व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती "अनधिकृत अनुपस्थिती" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचेविरुध्द आयुक्तालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५२९११४०००९२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, serialNumber=9ab69d6945f8950a9525831f8ae9726be295d17576e78d19fa8f6cb952bb04a0, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2020.05.29 12:25:50 +05'30'

(वि. पुं. घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
३) सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन), मुंबई
४) उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद
५) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, औरंगाबाद/जालना/हिंगोली
६) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/जालना/हिंगोली
९) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१०) मा.प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक
११) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१२) निवड नस्ती (सेवा - २ )